जून ते ऑक्टोबर,२०२० या कालावधीत नागपूर विभागातील वर्धा, चंद्रपूर जिल्हयामध्ये अतिवृष्टी व पुरामुळे बाधित झालेल्या शेतकऱ्यांना अतिरिक्त निधी उपलब्ध करून देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सीएलएस-२०२०/प्र.क्र. २१९ /म-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २७ डिसेंबर, २०२१

**संदर्भ :**
1. शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०१५/प्र.क्र.४०/म-३, दिनांक १३.५.२०१५
2. शासन निर्णय,महसुल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०१७/प्र.क्र.२६७/म-३, दिनांक २५.०१.२०१८
3. शासन निर्णय,महसुल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०२०/प्र.क्र.२१९/म-३, दिनांक ९.११.२०२०
4. शासन निर्णय,महसुल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०२०/प्र.क्र.२१९/म-३, दिनांक ०७.०१.२०२१
5. विभागीय आयुक्त,नागपूर यांचे पत्र क्रमांक.मशा-७(५)/नैआव्य/कावि-३५२/२०२१, दिनांक १७.०६.२०२१

**प्रस्तावना**:

राज्यात जून ते ऑक्टोबर,२०२० या कालावधीत विविध जिल्हयात अतिवृष्टी व पुरामुळे नुकसान झाल्याचे निर्दशनास आले आहे. या नैसर्गिक आपत्तीमुळे बाधित झालेल्या नागरिकांना मदत करण्यासंदर्भात मा.मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखाली दिनांक २३.१०.२०२० रोजी झालेल्या बैठकीत घेतलेल्या निर्णयास दिनांक २९.१०.२०२० रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. यानुसार संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये धोरणात्मक आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. राज्य कार्यकारी समितीच्या दि.३.११.२०२० रोजी झालेल्या बैठकीत निधी वितरणास प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार संबंधित विभागीय आयुक्त यांना संदर्भाधीन क्रमांक ३ व ४ येथील शासन निर्णयान्वये अतिवृष्टी व पुरामुळे झालेल्या शेतीपिकांच्या नुकसानीकरिता बाधित व्यक्तींना निधी वितरीत करण्यात आला आहे. विभागीय आयुक्त, नागपूर यांच्या संदर्भाधीन क्र.५ च्या पत्रान्वये जून ते ऑक्टोबर, २०२० मध्ये अतिवृष्टीमुळे व पुरपरिस्थितीमुळे झालेल्या शेतीपिकांच्या नुकसानीकरिता अतिरिक्त निधी उपलब्ध करून देण्याची विनंती केली आहे. त्यानुसार विभागीय आयुक्त, नागपूर यांना अतिवृष्टी व पुरपरिस्थितीमुळे शेतीपिकांच्या झालेल्या नुकसानीकरिता अतिरिक्त निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:</u>**

राज्यात जून ते ऑक्टोबर, २०२० या कालावधीत विविध जिल्हयात अतिवृष्टी व पुरामुळे बाधित झालेल्या नागरिकांना मदत देण्याबाबत संदर्भाधीन १ ते ३ येथील शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या बाबी व दरानुसार मदत देण्यासाठी संदर्भाधीन क्रमांक ४ ते ९ येथील पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार शेतीपिकांच्या नुकसानीसाठी संदर्भाधीन क्रमांक ३ व ४ येथील शासन निर्णयान्वये निधी वितरीत करण्यात आला आहे. विभागीय आयुक्त, नागपूर यांनी संदर्भाधीन क्र.५ च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार अतिवृष्टी व पुरामुळे झालेल्या शेतीपिकांच्या नुकसानीकरिता **रू.४९.९५ लक्ष (रूपये एकोण पन्नास लक्ष पंच्यान्नव हजार फक्त)** इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. या आपत्तीमध्ये शेतीपिकांच्या व बहुवार्षिक पिकांच्या झालेल्या नुकसानीसाठी खालील दराने मदत देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**<u>शेतीपिकांच्या नुकसानीसाठी मदत</u>**

| बाब | दयावयाची मदत | मदतीची रक्कम |
|---|---|---|
| शेतीपिकांच्या व बहुवार्षिक पिकांच्या नुकसानीसाठी मदत | जून ते ऑक्टोबर,२०२० या कालावधीत राज्यात अतिवृष्टी व पुरामुळे शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे किमान ३३ % नुकसान झाले आहे अशा बाधित शेतकऱ्यांना शेतीपिकांच्या (जिरायत व आश्वासित सिंचना खालील पिके) नुकसानीसाठी रू १०,०००/- प्रति हेक्टर व बहुवार्षिक पिकांच्या नुकसानीसाठी रू २५०००/- प्रति हेक्टर या दराने २ हेक्टरच्या मर्यादेत मदत देण्यात यावी. | शासन निर्णय, दि १३.५.२०१५ नुसार दयावयाच्या मदतीसाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधी (SDRF) मधून खर्च करण्यात यावा व वाढीव दरानुसार होणारा खर्च राज्य शासनाच्या निधीमधून करण्यात यावा. |

३. उपरोक्तप्रमाणे बाधित नागरिकांना शेतीपिकांच्या नुकसानीसाठी मदतीचे वाटप करण्यासाठी मंत्रिमंडळ उपसमितीने दिलेल्या मान्यतेनुसार जिल्हाधिकारी, वर्धा यांना लेखाशीर्ष २२४५ २४५२ अंतर्गत रू.२.९० लक्ष व लेखाशीर्ष २२४५ २३०९ अंतर्गत रू.१.३६ लक्ष व जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांना लेखाशीर्ष २२४५ २४५२ अंतर्गत रू.४५.६९ लक्ष असे लेखाशीर्ष २२४५ २४५२ मध्ये रू.४८.४९ लक्ष व लेखाशीर्ष २२४५ २३०९ मध्ये रू.१.३६ लक्ष अशी **एकूण रू.४९.९५ लक्ष (रूपये एकोणपन्नास लक्ष पंच्यान्नव हजार फक्त** ) इतकी रक्कम मागणी क्रमांक सी-६, प्रधान लेखाशीर्ष २२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य अंतर्गत लेखाशीर्षाअंतर्गत, ३१ सहाय्यक अनुदाने या उदिष्टाखाली पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध झालेल्या तरतूदीमधून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. या प्रयोजनासाठी होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदर निधी बीम्स प्रणालीवर म-११ कार्यासन यांनी तात्काळ वितरीत करावा.

अ) प्रधान लेखाशीर्ष २२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य, ०२, पूर, चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९१) **राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च**, (९१)(०५) नैसर्गिक आपत्तीमुळे पीक नुकसानीकरिता शेतकऱ्यांना मदत,३१ सहाय्यक अनुदाने **( २२४५ २४५२**)

ब) प्रधान लेखाशीर्ष २२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य, ०२, पूर, चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९२) **राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च,** (९२)(१२)

नैसर्गिक आपत्तीमुळे पीक नुकसानीकरिता शेतकऱ्यांना सहाय्य ,३१ सहाय्यक अनुदाने **( २२४५ २३०९)**

४. उपरोक्त निधीचे बाधितांना वाटप करताना संदर्भाधीन क्रमांक १, २, ३ येथील शासन निर्णयातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४७१/२०२१/व्यय-९, दिनांक २६.११.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२११२२७११२६५११४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2021.12.27 11:28:33 +05'30'

**( संजय औ. धारूरकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय,मुंबई,
३. महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधान सभा/विधान परिषद सदस्य,
४. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
५. सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई
६. विभागीय आयुक्त,नागपूर
७. आयुक्त (कृषी), महाराष्ट्र राज्य, पुणे
८. जिल्हाधिकारी, वर्धा, चंद्रपूर,
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१०. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
११. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा, चंद्रपूर
१३. मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१४. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१५. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१६. कार्यासन अधिकारी (म-११), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१७. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१८. निवड नस्ती (कार्यासन/ म-३).